राज्यातील निरिक्षणगृह, बालगृहे, अनाथालये
इ.च्या सनियंत्रणाकरीता राज्यस्तरीय
समितीची स्थापन करणेबाबत

2004071915304001-2500

महाराष्ट्र शासन
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय - निरिगृ-२०००/ प्र.क्र. १५२/ का-३
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मंत्रालय, मुंबई -३२
दिनांक -२८ ऑगस्ट २०००

निर्णय - शासन या निर्णयान्वये राज्यातील निरिक्षणगृहे, बालगृहे, अनाथालये तसेच बाल कल्याण मंडळे यांचे कामकाज नियमानुसार व सुरळीत पार पडण्यात येते किंवा नाही याची तपासणी करण्याकरीता मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार खालील प्रमाणे समिती गठीत करण्यास मंजूरी देत आहे.

| अ.क्र. | सदस्याचे नांव व पदनाम. | |
|---|---|---|
| १. | निवृत्त न्यायमूर्ती, हॉस्बेट सुरेश | - अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, महिला व बाल विकास | - सदस्य |
| ३. | सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग/ सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग | - सदस्य |
| ४. | श्रीमती आशा वाजपेयी, मुंबई | - सदस्य |
| ५. | श्रीमती कालिंदी मुजूमदार, मुंबई | - सदस्य |
| ६. | डॉ. शरद भौमिक, मुंबई | - सदस्य |
| ७. | उप सचिव, वित्त विभाग | - सदस्य |
| ८. | आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे - | सदस्य सचिव |

समितीची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.

१) राज्यातील निरिक्षणगृहे, बालगृहे, अनाथालय तसेच कामकाजाचे यांचे पर्यवेक्षण करणे.

२) बाल कल्याण मंडळाच्या सदस्यांच्या नेमणूकीबाबत शिफारस करणे

३) जिल्हास्तरीय अभ्यंगत मंडळ (Visitors Board ), सल्लागार मंडळ, समाजसेवक / सेविका, कर्तव्ये समुपदेशक यांच्या पदावर नेमणूकाबाबत शासनास सल्ला देणे.

४) बालगृहातून मुदतीनंतर / मुदतीपूर्वी बाहेर पडणा-या लाभार्थ्यांना सरकारी अथवा खाजगी क्षेत्रात रोजगार मिळवून देण्यासाठी प्रयत्न करणे.

सदर समितीमधील अशासकीय सदस्यांना राज्यस्तरीय समितीच्या बैठकीच्या कामानिमित्त वित्त विभागाच्या शासन निर्णयातील श्रेणी-१ च्या अधिका-यांप्रमाणेच प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देण्यात यावा. हा प्रवास भत्ता आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांना आस्थापना खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीतून भागवावा. अशासकीय सदस्यांच्या प्रवास भत्यावर प्रतिस्वाक्षरी करण्याचे अधिकार आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य पुणे यांना प्रदान करण्यात येत आहे.

आवश्यकतेनुसार मुंबईमध्ये समितीच्या बैठकीसाठी सचिव, महिला व बाल विकास यांचे दालनात जागा व कर्मचारीवृंद उपलब्ध करुन देण्यात येईल.

याबाबत होणारा खर्च क्र. क्र. एक्स-१ २२३५ -सामाजिक सुरक्षा व कल्याण -०२-समाज कल्याण -१०२- बाल कल्याण (बी -पंचावार्षिक योजना -स्वयंसेवी संस्थांना अनुदाने -४१- सहाय्यक अनुदान (२२३५-११९-२ ) या मुख्य लेखाशीर्षाखालील तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांचा अनौपचारिक संदर्भ प्र.क्र. ५७५ / २०००, व्यय-११, दि.२६.६.२००० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( राजेंद्र पवार )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,
महालेखापाल महाराष्ट्र राज्य.
लेखा परिक्षा मुंबई / नागपूर
लेखा अनुज्ञेयता मुंबई / नागपूर.
निवृत्त न्यायमूर्ती, हॉस्बेट सुरेश - अध्यक्ष
प्रधान सचिव, महिला व बाल विकास - सदस्य
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग- सदस्य
श्रीमती आशा वाजपेयी, सामाजिक कार्यकर्ती- सदस्य
श्रीमती कालिंदी मुजूमदार, सामाजिक कार्यकर्ती- सदस्य
डॉ. शरद भौमिक, मुंबई विद्यापीठातील समाजशास्त्र विषयाचे प्रमुख- सदस्य
उप सचिव (वित्त विभाग )
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
विभागीय महिला व बाल कल्याण अधिकारी.
सर्व जिल्हाधिकारी
जिल्हा, महिला व बाल कल्याण अधिकारी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवड नस्ती का-३

C:\MY\My Documents\Dictation Yogita.doc